राज्य सेवा हक्क आयुक्त, कोकण महसूली विभाग
कार्यालयास जागा उपलब्ध करुन देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : आरटीएस-३११९/प्र.क्र.९२/१८ (र व का)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १७ फेब्रुवारी, २०२०

वाचा :- १) शासन अधिसूचना क्र.आरटीएस-२०१६/प्र.क्र.१२४/१८(र व का), दि.१३.०९.२०१९
२) उप आयुक्त, विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई यांचे पत्र क्र.साशा/कक्ष-१/इमारत/कोकण भवन-जागा/२०२०, दि.०६.०२.२०२०

प्रस्तावना :-

महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम, २०१५ अन्वये राज्य सेवा हक्क आयुक्त, कोकण महसूली विभाग या पदावर श्रीमती. मेधा गाडगीळ, सेवानिवृत्त भा.प्र.से. यांची उक्त संदर्भ क्र.१ येथील दि.१३.०९.२०१९ च्या अधिसूचनेन्वये नियुक्ती करण्यात आलेली आहे. राज्य सेवा हक्क आयुक्त, कोकण महसूली विभाग यांच्या कार्यालयासाठी त्यांना जागा उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत विभागीय आयुक्त, कोकण विभाग यांनी सदरहू कार्यालयासाठी बेलापूर भवन इमारतीमधील ७ व्या मजल्यावरील जागा तसेच वाशी रेल्वे संकुलातील सिडको महामंडळाच्या ताब्यातील जागा रिकाम्या असून सदरहू जागेमध्ये ऑफीस सेटअप करण्यासाठी दुरुस्ती व फर्निचर करणे आवश्यक आहे असे कळविले आहे. या परिस्थितीत राज्य सेवा हक्क आयुक्त, कोकण महसूली विभाग यांना उक्त अधिनियमातील तरतुदीनुसार कोकण विभाग परिक्षेत्रामध्ये कामकाज चालविणे शक्य व्हावे यासाठी जागा उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. यास्तव त्यांना तात्पुरती व्यवस्था म्हणून अध्यक्ष, जिल्हा जाती पडताळणी समिती, ठाणे, कोकण भवन, नवी मुंबई या कार्यालयाच्या ताब्यातील कक्ष क्रमांक ७२५ ही शासकीय जागा कार्यालय स्थापन करण्यासाठी द्यावयाची आहे.

शासन निर्णय :-

राज्य सेवा हक्क आयुक्त, कोकण विभाग यांचे कार्यालय कोकण महसूली विभाग या कार्यक्षेत्रात तातडीने सुरु करण्यासाठी विभागीय आयुक्त, कोकण विभाग यांनी उक्त संदर्भ क्र.२ येथील पत्राद्वारे कळविल्यानुसार अध्यक्ष, जिल्हा जाती पडताळणी समिती, ठाणे, कोकण भवन, नवी मुंबई या कार्यालयाच्या ताब्यातील कक्ष क्रमांक ७२५ ही जागा राज्य सेवा हक्क आयुक्त, कोकण विभाग यांच्या कार्यालयासाठी तात्पुरत्या स्वरुपात उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

२. राज्य सेवा हक्क आयुक्त, कोकण विभाग यांनी सदरहू जागेचा ताबा विभागीय आयुक्त, कोकण विभाग यांच्याकडून त्वरीत घ्यावा व तेथे त्यांचे कार्यालय स्थापित करावे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२००२१८१७१०३०६४०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by SHRIRAM DATTATRAYA YADAV
Date: 2020.02.18 17:16:38 +05'30'

**( श्रीराम यादव )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव (५ प्रती) पत्राने
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव (५ प्रती), मंत्रालय, मुंबई-३२
३) सर्व मा.मंत्री /मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२
४) मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधान परिषद,विधानमंडळ, मंत्रालय, मुंबई-४०००३२
५) सर्व मा. संसद सदस्य/विधानसभा सदस्य/विधान परिषद
६) सचिव, राज्य निवडणूक आयोग (पत्राने), १३वा मजला, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई ४०० ०३२
७) मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०००३२
८) मा.महाअधिवक्ता, महाराष्ट्र राज्य, मा.मुंबई उच्च न्यायालय
९) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई
१०) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
११) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई
१२) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
१३) सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२
१४) महाप्रबंधक, मा.मुंबई उच्च न्यायालय, मुंबई
१५) प्रबंधक, मा.मुंबई उच्च न्यायालय, (मूळ शाखा), मुंबई
१६) प्रबंधक, लोकायुक्त व उप लोकायुक्त यांचे कार्यालय, १ला मजला, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई-३२
१७) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने), बँक ऑफ इंडीया इमारत, मुंबई २३
१८) प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई
१९) मा.मुख्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई
२०) मा.राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२१ ) सर्व विभागीय आयुक्त
२२) सर्व जिल्हाधिकारी
२३) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
२४) सर्व महानगरपालिका आयुक्त,
२५) सर्व पोलीस आयुक्त / सर्व पोलीस अधीक्षक,
२६) सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख/ प्रादेशिक प्रमुख
२७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२८) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
२९) कक्ष अधिकारी, कार्यासन अर्थ-१/व्यय-४/विसु.१, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३०) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई -३२,
३१) सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने, मंत्रालय, मुंबई-३२
३२) निवड नस्ती (कार्यासन १८ अ), सा.प्र.वि., मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.